**पीपीपी योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शासकीय औ.प्र.संस्थांतील व्यवसाय/ तुकड्यांमधील संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) करावयाच्या २०% प्रवेशाबाबत निर्गमित करण्यात आलेल्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या शासन निर्णय दि.०७.०७.२०१० मध्ये तसेच, राज्यातील सर्व शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील शिल्पकारागीर प्रशिक्षण योजनेंतर्गत प्रवेशासाठी केंद्रीय ऑनलाईन प्रवेशप्रणाली लागू करण्याकरिता आणि शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी लागू करावयाच्या प्रशिक्षण शुल्क नियमावलीस मान्यता देण्याबाबतच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या शासन निर्णय, दिनांक १४.०५.२०१५ मध्ये सुधारणा करण्याबाबत...**

<u>महाराष्ट्र शासन</u>

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पीपीपी -२०१८/प्र.क्र.८९/१८/व्यशि-५,**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u> :

१) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. आयटीआय २००९/(०५/०९)/ व्यशि ५, दिनांक ०७.०७. २०१०.
२) डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचे क्र.DGET-३५(१३९६)/Guidelines/२०१४- NIC, दि.२७.०३.२०१४.
३) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-३३१५/प्र.क्र.१७ / व्यशि ३, दिनांक १४.०५. २०१५.
४) राज्य सुकाणु समितीच्या दिनांक ०४.०३.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/पीपीपी /२०१८/४६, दिनांक ०७.०५.२०१८.
६) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/पीपीपी /२०१८/८०, दिनांक २८.०५.२०१८.
७) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक १८/पीपीपी /२०१८/८७, दिनांक १२.०६.२०१८.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्र शासन पुरस्कृत खाजगी सहभागाने (Public Private Partnership) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ करणे या योजनेंतर्गत सन २००७-०८ ते सन २०११-१२ या कालावधीत एकूण २५० औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा अंतर्भाव करण्यात आला आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून

प्रत्येक औ.प्र.संस्थेकरिता रु.२.५० कोटी इतकी व्याजमुक्त कर्जाऊ रक्कम उपलब्ध करून देण्यात आली असून सदर रक्कम संबंधित औ.प्र.संस्थेच्या संस्था व्यवस्थापन समितीच्या खात्यात जमा करण्यात आलेली आहे. सदर योजना मंजूर करताना केंद्रीय मंत्रिमंडळाच्या Cabinet Committee for Economic Affair (CCEA) ने संस्था व्यवस्थापन समितीस आय टी आय मधील २०% प्रवेश करण्यास परवानगी देण्यात यावी, अशा सूचना दिल्या होत्या. त्या अनुषंगाने डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन राज्यातील शासकीय औ.प्र.संस्थांमध्ये Public Private Partnership योजनेंतर्गत संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) करावयाच्या २०% प्रवेश व प्रवेशपद्धतीबाबत राज्य सुकाणू समितीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार पीपीपी अंतर्गत निवड करण्यात आलेल्या शासकीय औ.प्र.संस्थांतील संस्था व्यवस्थापन समितीच्या निधीतून सुरू करण्यात येणा-या सर्व नविन व्यवसाय/ तुकड्यांमधील २०% प्रवेश संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) करण्यास उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाच्या, डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांच्या संदर्भ क्र.२ च्या पत्रानुसार संस्था व्यवस्थापन समितीद्वारे ठरविलेल्या जागावरील प्रवेश हे पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिपद्वारे औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा दर्जावाढ करावयाच्या योजनेंतर्गत फक्त दर्जावाढ करावयाच्या व्यवसाय अभ्यासक्रमातील जागांना लागू राहणार नसून संस्थेतील एकूण सर्व व्यवसाय अभ्यासक्रमाच्या सर्व तुकड्याच्या जागांना लागू राहणार आहे अशा सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानुषंगाने राज्य सुकाणू समितीच्या दिनांक ०४.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत "औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील २०% प्रवेश संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करण्याबाबत निर्गमित केलेल्या दि.०७.०७.२०१० च्या शासन निर्णयात DGT च्या सूचनेप्रमाणे शुद्धीपत्रकाद्वारे बदल करण्यात यावा", असा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार राज्य सुकाणू समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यानुसार पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजनेंतर्गत समाविष्ट औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील २०% प्रवेश संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करण्याबाबत सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब तसेच, यानुषंगाने राज्यातील सर्व शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील शिल्पकारागीर प्रशिक्षण योजनेंतर्गत प्रवेशासाठी केंद्रीय ऑनलाईन प्रवेशप्रणाली लागू करण्याकरिता आणि शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी लागू करावयाच्या प्रशिक्षण शुल्क नियमावलीस मान्यता देणेबाबत, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय, दिनांक १४.०५.२०१५ मधील परिशिष्ट-१ मधील १५.३ मध्ये सुधारणा करण्याची बाब सदर नस्तीवर विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

पीपीपी योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांतील (औ.प्र.संस्था) व्यवसाय/ तुकड्यांमधील संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) करावयाच्या २०% प्रवेशाबाबत निर्गमित करण्यात आलेल्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र. आयटीआय-२००९/ (०५/०९)/व्यशि ५, दि.०७.०७.२०१० या शासन निर्णयामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

केंद्रशासन पुरस्कृत पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप द्वारे राज्यातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांतील सर्व व्यवसाय/ तुकड्यांमधील २०% प्रवेश संस्था व्यवस्थापन समितीद्वारे (IMC) पुढीलप्रमाणे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | तुकडीची प्रवेश क्षमता | अधिसंख्य जागा (सुपरन्युमरी सीट्स)(३०%) प्रमाणे प्रवेश क्षमता | प्रचलित पद्धतीनुसार औ.प्र.संस्थेने करावयाची प्रवेश संख्या (११०%) | संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करावयाची प्रवेश संख्या (२०%) |
|---|---|---|---|---|
| १ | १२ | १५ | १३ | २ |
| २ | १६ | २१ | १८ | ३ |
| ३ | २० | २६ | २२ | ४ |

१) सदर आदेश केंद्र शासन पुरस्कृत खाजगी सहभागाने (Public Private Partnership) दर्जावाढ करण्यास मान्यता मिळालेल्या राज्यातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील अस्तित्वात असलेल्या तसेच, ऑगस्ट, २०१८ पासून पुढे सुरु करण्यात येणा-या सर्व व्यवसाय/तुकड्याच्या प्रवेशाबाबत लागू राहणार असून संस्था व्यवस्थापन समितीने त्यांच्यामार्फत ऑगस्ट, २०१८ पासून पुढे संबंधित औ.प्र.संस्थेतील सर्व व्यवसाय/ तुकड्यामध्ये प्रवेशक्षमतेपेक्षा अधिकचे (सुपरन्युमरी ३० टक्के पैकी) २० टक्के प्रवेश गुणानुक्रमे द्यावेत. हे प्रवेश केंद्रीय ऑनलाईन पद्धतीने उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-३३१५/प्र.क्र.१७/ व्यशि ३, दिनांक १४.०५.२०१५ मध्ये विहीत केलेल्या प्रवेश नियमावलीनुसार करण्यात यावेत.

२) संबंधित औ.प्र.संस्थेतील व्यवसाय /तुकड्यांना त्यांची प्रवेश क्षमता अनुक्रमे १२, १६, २० असल्यास २० टक्केप्रमाणे अनुक्रमे २, ३ व ४ जागा ह्या संबंधित शासकीय औ.प्र.संस्थेच्या संस्था व्यवस्थापन समितीच्या जागांवर भरण्यात याव्यात व उर्वरित १० टक्के (सुपरन्युमरी ३० टक्के पैकी) जागा म्हणजे अनुक्रमे १, २ व २ जागा संबंधित संस्थेने प्रचलित पद्धतीने भराव्यात.

३) खाजगी औ.प्र.संस्थांना सुधारीत प्रशिक्षण शुल्क लागू करण्याबाबतचे आदेश उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-३३१५/प्र.क्र.१७/ व्यशि ३, दिनांक १४.०५.२०१५ नुसार मंजूर करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मधील १५.१ नुसार शासकीय औ.प्र.संस्थांमधील संस्था व्यवस्थापन समितीच्या जागांना शुल्क आकारण्यात यावेत.

४) पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील संस्था व्यवस्थापन समितीद्वारे करावयाच्या २०% प्रवेशाबाबतच्या मार्गदर्शक सूचना संदर्भ क्र.१ व ३ मधील शासन निर्णयानुसार राहील.

२. उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या शासन निर्णय, दिनांक १४.०५.२०१५च्या परिशिष्ट-१ मधील १५.३ मध्ये पुढीलप्रमाणे पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

**"पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिपद्वारे शासकीय औ.प्र.संस्थांचा दर्जावाढ करणे या योजनेंतर्गत समाविष्ट असलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील सर्व व्यवसायाच्या, सर्व तुकड्याच्या मंजूर प्रवेश क्षमतेच्या (प्रवेश नियम क्र.१.२.११ अन्वये) ११०% जागांकरिता शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे शुल्क लागू होईल, तसेच प्रवेश सत्र ऑगस्ट २०१८ पासून या योजनेतील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील सर्व व्यवसायाच्या सर्व तुकड्याच्या मंजूर प्रवेश क्षमतेच्या २०% जागांकरिता प्रवेश नियम क्र.१५.१**

**मधील शासकीय औ.प्र.संस्थेतील आय.एम.सी. च्या जागाकरिता नमूद केलेले शुल्क लागू होईल. तथापि, संबंधित शासकीय औ.प्र.संस्थांच्या संस्था व्यवस्थापन समिती, परिस्थितीनुरुप वरीलपेक्षा कमी फी आकारु शकतात. जर संस्था व्यवस्थापन समितीने कमी फी घेण्याचा निर्णय ठरविला असेल तर तो निर्णय सक्षम अधिका-याला प्रवेश प्रक्रिया सुरू होण्यापूर्वी कळविणे बंधनकारक राहील."**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००६१७२८३५५००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SD And E Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6d1f4d2e41b8e84bb98ddddcac3054927f82f9c1a5810e2874cdac2c44c28c2, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2018.10.06 17:31:10 +05'30'

( स. दि. खरात )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत**

१. महासंचालक, प्रशिक्षण, कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
२. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
५. मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, सी.बी.डी, बेलापूर, नवी मुंबई
८. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर ( संचालनालयामार्फत )
९. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( संचालनालयामार्फत )
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
१२. संबंधित प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था ( संचालनालयामार्फत )
१३. निवड नस्ती ( व्यशि ५ )